**राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत राज्यातील कृषि निर्यात क्षेत्रातील आवश्यक पायाभूत सुविधा विकास प्रकल्पांना प्रशासकीय व तांत्रिक मान्यता देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
शासन निर्णय क्रमांक राकृवियो ०८१०/प्र.क्र.१९२/२१-स,
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक : ०५ /०८/२०१०

**वाचा :** १. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे यांचेकडील पत्र जा.क्र.मरा कृपमं/प्रकल्प/ आरकेव्हीवाय/१८६०/२०१०, दि. २३.०६.२०१०.

२ कृषि व पदुम विभागाचे पत्र क्रमांक राकृवि-२०१०/प्र.क्र.५२/राकृवियो कक्ष, दिनांक२/८/२०१०.

**प्रस्तावना :**

देशातील कृषि क्षेत्राचा विकास ११ व्या पंचवार्षिक योजनेदरम्यान किमान ४ % दराने घडवून आणण्याकरिता तसेच कृषि क्षेत्रातील विविध नाविन्यपूर्ण उपक्रमांना चालना देता यावी त्याचप्रमाणे दिर्घकालीन लाभ देणा-या पायाभूत सुविधांचा विकास घडवून आणण्याकरिता केंद्र शासन राज्य शासनामार्फत १००% केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय कृषि विकास योजना राबवित आहे.

पणन विभागातर्फे राज्याच्या कृषि पणन क्षेत्रामधील सध्याच्या तसेच भावी गरजा लक्षात घेवून प्रमुख पायाभूत सुविधा विकासाच्यादृष्टीने अनेक निर्यात सुविधा केंद्रांची अपेडाच्या अर्थसहाय्याने उभारणी केलेली आहे. राज्यातील निर्यातविषयक कामास गती देण्याकरिता राज्यातील विविध भागातील प्रमुख कृषि उत्पादनांच्या अनुषंगाने आणखी निर्यात सुविधा केंद्रांची राज्यभरात उभारणी होणे आवश्यक आहे. तथापि हापूस आंब्याकरिता नियोजित विकीरण प्रकल्प व इतर ७ निर्यात सुविधा केंद्रांचे प्रस्ताव यापूर्वी 'अपेडा' या संस्थेस सादर करण्यात आले होते, तथापि यापूर्वी महाराष्ट्रास अनेक प्रकल्प मंजूर करण्यात आले असल्याचे तसेच यापूर्वी लाभ न घेतलेल्या इतर राज्यांकडून निर्यात केंद्रांसाठी अनुदानाची येणारी मागणी आणि अपेडाकडील निधीची कमतरता लक्षात घेता, सदर प्रकल्प राज्यास मंजूर करता येणे शक्य नसल्याचे अपेडाने शासनास कळविलेले आहे.

उपरोक्त परिस्थिती लक्षात घेता, त्याचप्रमाणे राकृवियोच्या मार्गदर्शक सूचनांनुसार सदर प्रकल्प अपेडाच्या अर्थसहाय्याच्या पॅटर्नप्रमाणे (७५% अनुदान) स्विकारता येणे शक्य असल्याने हे सर्व प्रकल्प राकृवियो अंतर्गत प्रस्तावित करण्यात यावेत असे अपेडाने निर्देशित केलेले आहे. अपेडाच्या निदेशांच्या

अनुषंगाने तसेच महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळाने खालील प्रकल्पांच्या प्रस्तावांची तांत्रिक व प्रशासकीय छाननी करुन शासनास सादर केले असल्याचे लक्षात घेता शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

१. राज्यातील विविध भागांमधील प्रमुख कृषि उत्पादनांच्या अनुषंगाने पणन विभागातर्फे पुढील प्रकल्प राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत प्रकल्प किंमतीच्या ७५% अनुदानाकरिता प्रस्तावित करण्यात येत आहेत.

**(रुपये लाखात)**

| अ. क्र. | प्रकल्पाचे नाव | प्रकल्प खर्च | अनुदानाचा प्रस्ताव | प्रकल्पाचे उद्दीष्ट |
|---|---|---|---|---|
| १ | विकरण व इतर संलग्न सुविधा केंद्र, वाशी, नवी मुंबई. | १८७९.७२ | १४०९.७९ | राज्यामध्ये स्थानिक निर्यातक्षम दर्जेदार कृषि उत्पादनाच्या निर्यातीकरिता आवश्यक पायाभूत सुविधांची उभारणी करणे. |
| २ | डाळींब व द्राक्ष निर्यात सुविधा केंद्र, आटपाडी, जि. सांगली | २६२.२१ | १९६.६६ | |
| ३ | केळी निर्यात सुविधा केंद्र, इंदापूर, जि. पुणे. | ५२९.४ | ३९७.०५ | |
| ४ | डाळींब, द्राक्ष व कांदा निर्यात सुविधा केंद्र, कळवण, जि. नाशिक. | ९५०.५५ | ७१२.९१ | |
| ५ | केळी निर्यात सुविधा केंद्र, यावल, जि. जळगांव. | ५२०.३६ | ३९०.२७ | |
| ६ | संत्रा निर्यात सुविधा केंद्र, अमरावती. | ५५६.८ | ४१७.६ | |
| ७ | केशर आंबा निर्यात सुविधा केंद्र, बीड. | ५०३.२८ | ३७७.४६ | |
| ८ | फळे व भाजीपाला निर्यात सुविधा केंद्र, रहाता, जि. अहमदनगर. | ५०४.९४ | ३७८.७१ | |

२. अनुक्रमांक १ येथील नमूद सर्व प्रकल्पांना या विभागाची तांत्रिक व प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

३. सदरच्या प्रकल्पांना विभागाची केवळ प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्रदान करण्यात येत असून सदर प्रकल्पांना राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या राज्यस्तरिय प्रकल्प मंजूरी समितीची मान्यता मिळणे आवश्यक असून तद्नंतरच या प्रकल्पांची अंमलबजावणी करण्यात येईल.

४. विभागाने अर्थसहाय्याचा उपरोक्त प्रस्ताव मान्य केला असला तरी सदर प्रकल्पांकरिता राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समिती अर्थसहाय्याच्या जो आराखडा मंजूर करेल त्याच धर्तीवर प्रकल्पांची अंमलबजावणी करण्यात येईल.

५. सदरच्या प्रकल्पांच्या अंमलबजावणीसाठी महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे यांची नोडल एजन्सी म्हणून नेमणूक करण्यात येत असून या योजनेच्या अंमलबजावणी विषयक मार्गदर्शक सुचना राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या मान्यतेनंतर निर्गमित करण्यात येतील.

सदर शासन निर्णय शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१००८१८१६२१४९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही /-
(श्रीकांत चं. आंडगे)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन,
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग.

**प्रत :**

१ अपर मुख्य सचिव(कृषि), मंत्रालय,मुंबई
२ प्रधान सचिव (सहकार व पणन), मंत्रालय, मुंबई-३२.
३ प्रधान सचिव (नियोजन), मंत्रालय, मुंबई-३२.
४ प्रधान सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई-३२
५ प्रधान सचिव (जलसंधारण), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६ प्रधान सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७ सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८ आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९ कृषि पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१० कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, गुलटेकडी, मार्केटयार्ड, पुणे.
११ सर्व जिल्हा उप निबंधक, सहकारी संस्था,
१२ निवड नस्ती